अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या वसतिगृहाच्या व्यवस्थापनाकरिता व बांधकामाकरिता निधी उपलब्ध करणेबाबत..... सन २०२३-२४ करीता निधी वितरण

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : वसगृ २०२३/प्र.क्र.१४ /का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : ६ मार्च, २०२४**

**वाचा-**

१. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि-२००९/प्र.क्र.१५/का-८, दि. २ मार्च, २०१०.
२. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र.वसगृ-२०११/प्र.क्र.१३०/का-८, दि.२० डिसेंबर, २०११.
३. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ -२०१२/प्र.क्र.१६८/का-८, दि.२१ जून, २०१३.
४. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ -२०१२/प्र.क्र.१६८/का-८, दि.२८ जुलै, २०१५.
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२ एप्रिल, २०२३
६. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ २०२३/प्र.क्र.१४ /का.८, दि.४ जुलै, २०२३ ,दि.२७ जुलै,२०२३ दि.११ सप्टेंबर, २०२३ व दि. ६ ऑक्टोबर, २०२३, ७ नोव्हेंबर, २०२३, दि.९ जानेवारी, २०२४
७. जिल्हाधिकारी, रायगड यांचे पत्र क्र. साशा/कार्या-१/ब-४/उपयोगिता प्रमाणपत्र/२०२४, दि.२९ फेब्रुवारी, २०२४

**प्रस्तावना -**

राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनींसाठी वसतिगृहे बांधण्याबाबत संदर्भांकित क्रमांक १ येथील दिनांक २ मार्च, २०१० चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. राज्यातील विविध विद्यापीठांमध्ये उपलब्ध असलेल्या जमिनीवर अल्पसंख्याक मुलींसाठी वसतिगृह बांधण्यासंदर्भातील कार्यपध्दती संदर्भांकित क्रमांक २ येथील दिनांक २० डिसेंबर, २०११ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे. तसेच अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांकरिता बांधण्यात येत असलेल्या वसतिगृहांच्या व्यवस्थापनाबाबतची कार्यपध्दती संदर्भांकित क्रमांक ३ व ४ येथील दिनांक २१ जून, २०१३ व दिनांक २८ जुलै, २०१५ रोजीच्या शासन निर्णयांन्वये निश्चित करण्यात आली आहे.

**२.** अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या वसतिगृहाचे व्यवस्थापन व बांधकामासाठी सन २०२३-२४ करिता "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली रु.२१,७६,००,००० /- इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सन २०२३-२४ करीता

रु.१५,२३,२०,००० /- इतका सुधारीत अंदाज मंजूर केला आहे. संदर्भ क्र. ७ च्या पत्रान्वये जिल्हाधिकारी, रायगड यांनी अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या वसतिगृहाच्या व्यवस्थापनाकरिता निधी वितरित करण्याची मागणी केलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ च्या शासन परिपत्रकास अनुसरुन सदरचा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ येथील दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन निर्णयान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता असलेल्या वित्तीय बंधनाच्या मर्यादेस अनुसरुन जिल्हाधिकारी, रायगड यांना अल्पसंख्याक मुलींच्या वसतिगृहाच्या व्यवस्थापनाकरिता व बांधकामाकरीता एकूण **रु.१७,३०,०००/- (अक्षरी रुपये सतरा लाख तीस हजार फक्त)** निधी खालीलप्रमाणे वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | वसतिगृहाचे ठिकाण | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| व्यवस्थापनाकरिता | | |
| १. | शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल, जि. रायगड | रु.१७,३०,०००/- |
| **(अक्षरी रुपये सतरा लाख तीस हजार फक्त)** | **एकूण :** | **रु.१७,३०,०००/-** |

**४.** वरीलप्रमाणे जिल्हाधिकारी, रायगड यांना त्यांच्या अधिपत्याखालील उपरोक्त तक्त्यात नमुद अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या वसतिगृहाच्या व्यवस्थापनाकरिता **रु.१७,३०,०००/- (अक्षरी रुपये सतरा लाख तीस हजार फक्त)** एवढी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

**५.** सदर तरतूद जिल्हाधिकारी, रायगड यांचेकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरीता जिल्हाधिकारी, रायगड हे नियंत्रक अधिकारी आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी - आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

**६.** सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व खर्च मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेत ठेवण्यात यावा. केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, रायगड यांची राहील. तसेच अतिप्रदान व अखर्चित निधी परतावा शासनास भरणा (जमा) करण्याबाबत वित्त विभागाच्या सूचनांनुसार संबधित जिल्हाधिकारी यांनी कार्यवाही करावी.

**७.** सदरचा खर्च करताना वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C. च्या मार्गदर्शक तत्वांचा / CAG च्या निदेशानुसार कोणताही शासन निर्णय/अटी व शर्तीचा भंग होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी, रायगड यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी जिल्हाधिकारी, रायगड यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

८. सदरचा खर्च मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ करिता उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, उपविभाग-एक मधील अट क्र.२७ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील कार्यपद्धती व अटींची पुर्तता करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०२४०३०६११३७५४६११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANAND NARAYANRAO BHONDVE

Digitally signed by ANAND NARAYANRAO BHONDVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=a11586f7ebf5942c9727d91c8c251f01dab61da28a62264d92646e4dc3827d4d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D040EF80427E869FA7C6F2F326EAF61F9B4591294C9BE6229580E816D54D3859, cn=ANAND NARAYANRAO BHONDVE
Date: 2024.03.06 11:47:08 +05'30'

**(आ. ना. भोंडवे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई / नागपूर
२. महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व परीक्षा), मुंबई / नागपूर
३. जिल्हाधिकारी, रायगड
४. प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय पनवेल, जि. रायगड
५. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई
६. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
७. वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय-१) मंत्रालय, मुंबई
८. नियोजन विभाग (कार्या.१४७१)
९. कक्ष अधिकारी, का.७, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी उक्त रकमा संबंधिताना कृपया B.D.S. वर तात्काळ उपलब्ध करुन देण्यात याव्यात
१०. निवड नस्ती, कार्यासन-८